म्हटलें. व्यासांनीं गंगेंत बुडी मारून, तीरावर एक मात्र भारतीय [illegible]चा सारा चमत्कार दाखविला. व्यासांच्या कृपेनें अंध व [illegible] यांनी तो चमत्कार प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहिला. सान्यानाच आपआपले जिवलग जिव्हाळे पाहून अचंबा वाटला. धर्मानें कर्णाला वडील बंधू म्हणून भेटण्यास कमी केलें नाहीं. रात्र संपतांच हें स्वप्नही संपून नाहींसें झालें. व्यासांच्या आज्ञेनें कौरव स्त्रियांनीं गंगा प्रवेश करून, त्या परलोकीं आपआपल्या पतीला जावून मिळाल्या. व्यासांनीं धृतराष्ट्राला सांगितलें कीं हें जसें भारतीय [illegible] चुटकीचें स्वप्न पाहिलेंस, अशाच तऱ्हेची थोडी जास्त लांबीची स्वप्नें, म्हणजेच इहलोकाची यात्रा होय, हें जाणूनच आत्मरूपीं सावधान राहा.

स्त्रियांसह पांडव हस्तनापुरास परत गेले. इकडे धृतराष्ट्र, गांधारी व कुंती अगदीं थकत चालली होती. ती एकदां गंगेहून स्नान करून आश्रमास परत येत असतां वनांत भयंकर वणवा पेटला. त्यांत ती तिघे सांपडण्याच्या वेळींच, प्राण निरोधन करून, ईश्वरस्मरणांतच नाशिवंत देहाचा त्याग केला. अग्निनारायणानें त्यांची जर्जर शरीरें जाळून टाकलीं. ही हकीकत नारदांनीं हस्तनापुरी धर्मसभेंत सांगतांच एकच आकांत झाला. मातेहून द्रौपदीला अधिक प्रिय असलेली सासू कुंती, परत्र पावलेली कळतांच, तिच्या दुःखास पारावारच उरला नाहीं. पांडवांनी मृतांच्या उत्तर क्रिया, गंगातीरीं यथाविधी श्रद्धापूर्वक संपादल्यावर, जड अंतःकरणांनींच ते परत राजधानीस आले. वडीलधाऱ्या माणसांचें संरक्षक विश्रांति छत्र नाहींसें झाल्यानें पांडवापेक्षां कोंवळ्या मनाच्या गृहिणीपद भूषण द्रौपदीलाच घडोघडी, अडल्यासारखें होई. तिला निष्कंटक व्यवहार सुख निरस वाटे. पण विश्वभक्षक काळाच्या पोटांत क्रमाक्रमानें सारेंच पचले जाणार असल्यामुळें काळचक्राच्या फेऱ्यांत, येईल तो दिवस, आसत्व जागृतीनें, आला तसा संपादून नेला पाहिजे, हें सुजाण द्रौपदीला पुरें ठाऊक होतें. यामुळें मृतांच्या आठवणीनें, स्वतः दुःखी होऊन, पतींना दुःखी करण्याची अविचार, सहसा तिच्या हातून घडत नसे. कृष्णचरणीं ती अखंड विलीन वृत्तीनें सावधान असे, आणि म्हणूनच कृष्णही तिच्या ठिकाणीं आत्मत्वानें सदा जागृत असे.

" मनमोहन श्रीरंगाला आपलासा करून घेण्यासाठीं, आम्ही अहोरात्र जिवाचा धडपड करीत असतां, वन्स, तिकडची स्वारी, आपल्याला मात्र कशी अगदीं हुकमतीनं वश असते, याचं बाई नवल वाटतं! आम्हाला तेव्हां अपलां वश करणं विद्या शिकवा ना! ' ही विनोदी पण मार्मिक पृच्छा एकदां सत्यभामेनें द्रौपदीला केली असता, द्रौपदीनें आपल्या खऱ्या भक्ति भावाचें इंगित " भाव तोचि देव " या साध्या आणि सरळ श्रद्धेंतच असल्याचें सांगून, ह्मटलें, " वहिनी, माझा भाव तुला भईराया कृष्ण, भक्तिवश राहण्याला कधीं ... हो चुकायचा! जसा भक्तीचा रंग, तसा देवाचा संग! हा उघडा हिशेब नव्हे का? यांत त्याला तरी कां फुकट देव? नी. नसत्या वशीकरणाचा कशाला जयघोष ' सुभद्रेची अशीच एक गोष्ट हरिगुण गायनाकडून ऐकावयाला सांपडतें, कृष्णभगिनी सुभद्रा हिनें एकदा कृष्णाला विचारलें कीं कृष्णा, मी तुझी सख्खी बहीण असतां, तुझें नुसत्या मानलेल्या द्रौपदी बहिणीवरच अधिक प्रेम कां असावें? यावर दयाघन कृष्ण नुसता हंसला. तो तेव्हां हातांत चाकू घेऊन, लेखणी तासीत होता. बहिणीच्या प्रश्ना कौतुकांत, हात कसा चाचरीं गेला, हें खरोखर हरीच जाणें चाकूनें कृष्णाचें बोट बरेंच कापलें गेलें, व भळभळ रक्त वाहूं लागलें. पाण्यांत चिंधी भिजवुन पाणीपट्टी दिल्यानें, रक्त बंद होण्याचें काम सहज होणार होतें ह्मणून प्रेमळ बहिण सुभद्रा चिंधी आणण्यासाठीं घरांत धावली पण हरिमायेचा अगाध खेळ कोणाला कळणार? सुभद्रेला चिंधीच सापडेना. इतक्यांत द्रौपदी तेथें सहजी आली. तें कृष्णाच्या बोटाचें रक्त पाहून, तिचा जीव कळवळला. तत्क्षणी आपल्या अंगावरल्या वस्त्राच्या पदराची चिंधी फाडून, ती पाण्यांत भिजवून, द्रौपदीनें कृष्णाचें बोट बांधलें, व मग ती त्या बांधलेल्या बोटावर थेंब थेंब पाणी सोडीत, कृष्णाशीं गोष्टी बोलत बसली. अर्जुनानें इंद्रलोकाहून आणलेल्या बहुमोल शालूचाच पदर आपण फाडला, हें कृष्णकार्याच्या भरांत द्रौपदीच्या लक्षांतही आलें नाहीं. इतक्यांत " कृष्णा, चिंधी सांपडनारे, तुझें एखादें जुनं धोतर तरी कुठं आहे तें नेमकं सांग, म्हंजे त्याची धागोटी फाडून आणतें, तेथवर बोट दाबून धर. ' असें ओरडून ह्मणतच सुभद्राबाहेर आली पहाते तो द्रौपदीनें

आपल्या अंगावरच्या पृथ्वीमोल वस्त्राची चिंधी फाडून, कृष्णाचें काम केव्हांच होऊन गेलें आहे. सुभद्रा व द्रौपदी, या दोन बहिणींतले, कृष्णाविषयींच्या आस्थेचें अंतर दाखविणारा हा साधा प्रसंग पाहून सुभद्रादेवी उमजली या व्यवहारी उदाहरणावरून द्रौपदीच्या ईश्वरपरायण भावनेचे शुद्धतेची कल्पना करतां येण्यासारखी आहे.

निस्सीम ईशभक्ती, अलोट पतिनिष्ठा, सत्यत्व पूर्ण आत्मश्रद्धा, दंभहीन, दानशूरता, न्याय निष्ठूर, सदयता, प्रसंगशूर, सधीरता, सत्शील प्रपंच कुशलता, असल्या अनेक अलौकिक सद्गुणाचें उत्कृष्ट उदाहरण घालून देणारी देवी द्रौपदीची जीवयात्रा, जिवाच्या जिव्हाळ्याच्या भारी किमतीनें, विनाशानंतर, साधुच्या परित्राण कालांत, अनुरूप सार्वभौम पतिसह प्रपंचरंगांत, निष्कंटक व्यवहार सुरू उदासीन वृत्तींत भोगीत भोगीत, घसे खाचखळ्गे न उरलेल्या काळ गतीच्या सरळ रस्त्यानें, अपेक्षित आक्रम गाठीत होती; इतकें सांगून हें नवल कथा परिप्लुत पुण्यपावन चरित्र येथेंच पुरें करूं.

